शासकीय कर्मचाऱ्यांची नियत सेवावधीपूर्वी सेवानिवृत्ती.

---

वयाच्या ५०/५५ वर्षांपलीकडे/अर्हताकारी सेवेच्या ३० वर्षांच्या कालावधीपुढे सेवेत रहाण्याची शासकीय कर्मचाऱ्यांची पात्रा-पात्रता अजमाविण्याचा निकष.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक: एसआरसी-१०८५/१०२९/४३/१५,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक २४ फेब्रुवारी, १९९३.

संदर्भ :- [१] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:एसआरसी-१०७७/१५, दिनांक २ सप्टेंबर, १९७७.

[२] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरसी-१०८२/९५२/१५, दिनांक १ सप्टेंबर, १९८३.

[३] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरसी-१०८२/९५२/१५, दिनांक ३० नोव्हेंबर, १९८४.

[४] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरसी-१०८५/१०२९/४३/१५, दिनांक १२ मे, १९८६.

[५] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरसी-१०८५/१०२९/४३/१५, दिनांक १ एप्रिल, १९८९.

परिपत्रक :- राज्य शासकीय वर्ग ३ च्या कर्मचाऱ्यांना वयाच्या ५५ व्या वर्षांपलीकडे सेवेत राहण्याची पात्रापात्रता अजमाविण्यासंबंधात करावयाच्या पुनर्विलोकनासाठी शारिरीक क्षमता, निर्विवाद सचोटी, "चांगला पेक्षा कमी नाही" असा अभिलेख व वर्ग ४ च्या कर्मचाऱ्यांना वयाच्या ५५ व्या वर्षांपलीकडे सेवेत राहण्याची पात्रापात्रता अजमाविण्यासंबंधात करावयाच्या पुनर्विलोकनासाठी शारिरीक क्षमता, निर्विवाद सचोटी, "साधारण पेक्षा कमी नाही" असा अभिलेख हा निकष शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरसी-१०८५/१०२९/४३/१५, दिनांक १२ मे, १९८६ अन्वये विहित करण्यात आलेला आहे. हाच निकष वर्ग ३ व ४ च्या कर्मचाऱ्यांच्या अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण होते वेळी करावयाच्या पुनर्विलोकनासाठी विहित करण्यात आल्याचे शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरसी-१०८५/१०२९/४३/१५, दिनांक १ एप्रिल, १९८९ अन्वये स्पष्ट करताना अनवधानाने वर्ग ३ व ४ च्या कर्मचाऱ्यांच्या पुनर्विलोकनासाठी वर निर्देशिलेले भिन्न निकष नमूद करण्याऐवजी शारिरीक क्षमता, निर्विवाद सचोटी, व "चांगला पेक्षा कमी नाही" असा अभिलेख हा एकच निकष नमूद केला गेला आहे.

२. तरी शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरसी-१०८५/१०२९/४३/१५, दिनांक १ एप्रिल, १९८९ च्या आदेशातील वर निर्देशिलेली विसंगती

[कृ.मा.प.]

दूर करण्याच्या हेतूने सर्व संबंधितांच्या माहितीसाठी खुलासा करण्यात येत आहे की, अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण होते वेळी करावयाच्या वर्ग ३ च्या कर्मचा-यांच्या पुनर्विलोकनासाठी शारिरीक क्षमता, निर्विवाद सचोटी, "चांगला पेक्षा कमी नाही" असा अभिलेख हा निकष व वर्ग ४ च्या कर्मचा-यांच्या पुनर्विलोकनासाठी शारिरीक क्षमता, निर्विवाद सचोटी, "साधारण पेक्षा कमी नाही" असा अभिलेख हा निकष विहित करण्यात आलेला आहे असे समजण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अ. ग. मंडपे,
उप सचिव,
महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्य मंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्र्यांचे स्वीय सहाय्यक,
सर्व राज्यमंत्र्यांचे स्वीय सहाय्यक,
सर्व उपमंत्र्यांचे स्वीय सहाय्यक,
मुख्य सचिव/शासनाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग,
निवड नस्ती.

--------